प्रति,

सर्व जिल्हादंडाधिकारी,
सर्व पोलीस आयुक्त,

क्रमांक:बीसीआर ५३२००२/२६/विशा-५, गृह विभाग (विशेष), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १४ जून, २००२.

विषय:-चित्रपटगृहात वर्षातून किमान ४ आठवडे मराठी चित्रपट प्रदर्शित करण्यासाठी राखून ठेवण्याबाबत.

संदर्भ:-शासन आदेश क्र.बीसीआर ६५६३/५३४८३/ एक्सव्हीआय, दि.६.३.६८.

उक्त विषयाबाबत कळविण्यात येते की, संदर्भाधिन आदेशान्वये चित्रपटगृहात वर्षातून किमान ४ आठवडे मराठी चित्रपट प्रदर्शित करण्यासाठी राखून ठेवावे अशा सूचना शासनाने यापूर्वीच दिलेल्या आहेत. त्याप्रमाणे चित्रपटगृह चालक वर्षातील किमान ४ आठवडे मराठी चित्रपट प्रदर्शित करतात अथवा नाही याबाबत तपासणी करण्याची जबाबदारी परवाना प्राधिकारी म्हणून जिल्हादंडाधिकारी/पोलीस आयुक्त यांची आहे. परंतु राज्यातील बहूतांश चित्रपटगृहे शासनाने दिलेल्या सूचनांचे पालन करीत नाहीत. चित्रपटगृहात मराठी चित्रपट प्रदर्शित करीत नाही व परवाना प्राधिकारीही चित्रपटगृहाने मराठी चित्रपट प्रदर्शित केले अथवा नाही याबाबत तपासणी करीत नाही असे शासनाच्या निदर्शनास आणण्यात आले आहे. मराठी ही राजभाषा आहे. तसेच शासकीय कामकाजाची व जनतेची बोलीभाषाही मराठी आहे असे असतांनाही राज्यात मराठी भाषेतून निर्मित केलेले चित्रपट चित्रपटगृहात प्रदर्शित केले जात नाही अथवा मराठी चित्रपट प्रदर्शनाकरीता चित्रपटगृह उपलब्ध होऊ शकत नाही ही बाब निश्चित भुषणावह नाही. त्यामुळे याद्वारे शासन असे आदेश देत आहे की, यापूढे चित्रपटगृह परवाना नुतनीकरण करतांना सदर चित्रपटगृहात वर्षातील चार आठवडे मराठी चित्रपट प्रदर्शित करण्यात आले अथवा नाही याबाबत परवाना प्राधिका-यांनी तपासणी करावी. तत्पूर्वी आपल्या परिक्षेत्रातील सर्व चित्रपटगृह चालकांना वर्षातील चार आठवडे मराठी चित्रपट प्रदर्शनाकरीता राखून ठेवण्याबाबत आवश्यक सूचना तात्काळ देण्यात याव्यात. तसेच चित्रपटगृहात मराठी चित्रपट प्रदर्शनाकरीता काही अडचणी उद्भवत असल्यास अशा अडचणीचे निराकरण करण्याच्या दृष्टीने आवश्यक कार्यवाही करावी.

उक्त नमूद केल्याप्रमाणे सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने परवाना प्राधिका-यानी स्वत: जातीने लक्ष द्यावे व संबंधितांना आवश्यक सूचना द्याव्यात.

( वि. तु. प्रभू )
कक्ष अधिकारी, गृह विभाग (विशेष), महाराष्ट्र शासन.